राज्य सांस्कृतिक पुरस्कार - २०२४ जाहीर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. रासापु-२१२४(११)/प्र.क्र.२३३/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. एडब्ल्यूडी-१०९१/प्र.क्र.१२०/सां.का.१, दि.२३ जुलै, १९९२
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. रासांपु २१२२ (१३)/प्र.क्र.३८२/सां.का.४, दिनांक २९ नोव्हेंबर, २०२२
३) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सां.का.सं ३५०२, दिनांक ११ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट क्र. १ च्या शासन निर्णयान्वये, नाटक, कंठसंगीत, उपशास्त्रीय संगीत, वाद्यसंगीत, मराठी चित्रपट, किर्तन/समाज प्रबोधन, तमाशा, शाहिरी, नृत्य, लोककला, आदिवासी गिरीजन आणि कलादान या १२ क्षेत्रांमध्ये ज्या कलाकारांनी प्रदीर्घ काळ सेवा केलेली आहे अशा कलाकारांना राज्य सांस्कृतिक पुरस्कार प्रदान करण्याच्या योजनेस मान्यता देण्यात आलेली आहे. उपर्निर्दिष्ट क्र. २ च्या शासन निर्णयान्वये राज्य सांस्कृतिक पुरस्कारांचे पुरस्कार्थी निवडण्यासाठी निवड समिती गठीत करण्यात आलेली आहे. सन २०२४ या वर्षातील राज्य सांस्कृतिक पुरस्कार जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"राज्य सांस्कृतिक पुरस्कार" समितीने निवड केल्यानुसार सन २०२४ यावर्षासाठी खालीलप्रमाणे पुरस्कार्थींची नावे या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येत आहेत.

**राज्य सांस्कृतिक पुरस्कार**

| अ.क्र. | कलाक्षेत्र | पुरस्कार प्राप्त मान्यवरांचे नाव |
|---|---|---|
| १. | नाटक | श्रीमती विशाखा सुभेदार |
| २. | उपशास्त्रीय संगीत | डॉ. विकास कशाळकर |
| ३. | कंठसंगीत | श्री. सुदेश भोसले |
| ४. | लोककला | श्री. अभिमन्यू धर्माजी सावदेकर |
| ५. | शाहिरी | शाहीर राजेंद्र कांबळे |
| ६. | नृत्य | श्रीमती सोनिया परचुरे |
| ७. | चित्रपट | श्रीमती रोहिणी हट्टंगडी |
| ८. | किर्तन/समाजप्रबोधन | श्री. संजयनाना धोंडगे |
| ९. | वाद्यसंगीत | श्री. पांडुरंग मुखडे |
| १०. | कलादान | श्री. नागेश सुर्वे (ऋषीराज) |
| ११. | तमाशा | श्री. कैलास मारुती सावंत |
| १२. | आदिवासी गिरीजन | श्री. शिवराम शंकर धुटे |

०२. सदर खर्च मागणी क्र. झेड डी-२, २२०५-कला व संस्कृती, ००, १०१ ललीत कला शिक्षण, (०५) कला क्षेत्रात उल्लेखनिय पारितोषिके, (०५) (०१) अभिनय कला क्षेत्रात उल्लेखनीय कार्याबद्दल पारितोषिके (कार्यक्रम) (२२०५ १४३६), ०५-बक्षिसे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १०७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८१२१७१९१९८४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.08.14 15:08:32 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,मलबार हिल, राजभवन, मुंबई
२. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. मा. सभापती/उप सभापती, विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
८. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा / विधान परिषद यांचे खाजगी सचिव
९. सर्व मा. सदस्य, विधानसभा / विधान परिषद
१०. अपर मुख्य सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२. सर्व मान्यवर सन्मानार्थी (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्यामार्फत)
१३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ३२
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)

१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
१९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
२०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
२१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
२२. निवड नस्ती, सां.का.४